शासकीय/अशासकीय तज्ञ व्यक्तींची "बाल विकास सल्लागार समिती" गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक समिती-२०२२/प्र.क्र.१२३/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २० एप्रिल, २०२३

**शासन निर्णय :-**

राज्यातील बालकांवरील अत्याचार व फसवणुकीबाबत मागील १२ महिन्यात घडलेल्या, मिडीयामध्ये प्रसिध्द झालेल्या प्रकरणांची सखोल चौकशी करून त्यामधील समस्या, त्यावरील उपाययोजना व इतर अनुषंगिक बाबींच्या संदर्भात शासनास सविस्तर अहवाल सादर करण्याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली बाल विकासाच्या क्षेत्रात तज्ञ असलेल्या शासकीय/अशासकीय सदस्यांची "बाल विकास सल्लागार समिती" खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे | अध्यक्ष |
| २. | डॉ. दिपक वालोकर | सदस्य |
| ३. | डॉ. वृशाली देशपांडे | सदस्य |
| ४. | श्री. श्रीकांत जोशी | सदस्य |
| ५. | सौ. श्रेया श्रीकांत भारतीय - समन्वयक | सदस्य |
| ६. | श्री. विजय जाधव | सदस्य |
| ७. | ॲड. अमृता साठे पाठक | सदस्य |
| ८. | श्री. शिरीष पटवर्धन | सदस्य |
| ९. | श्री. सदाशिव चव्हाण | सदस्य |
| १०. | सौ. सुचित्रा देहेरकर इंगळे | सदस्य |
| ११. | उप आयुक्त, (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे. | सदस्य सचिव |

२. उपरोक्त "बाल विकास सल्लागार समिती" खालील मुद्यांवर विचार व शिफारस करेल:-

अ) महिला व बाल विकास विभागामार्फत समाजातील बालक या दुर्बल घटकाच्या विकासाचे प्रश्न, धोरण, कायदे, कल्याणकारी उपक्रमांबाबत केंद्र शासन व राज्य शासनाच्या योजनांचा अभ्यास करणे, त्यामध्ये आवश्यक ते बदल सुचविणे, तसेच, सदर योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याबाबत उपाययोजनांची शिफारस करणे.

आ) सदर समिती ही "बाल विकास सल्लागार समिती" असल्यामुळे समितीमधील सदस्यांना कोणत्याही प्रकारचे मानधन अनुज्ञेय राहणार नाही व त्यांचे कार्यक्षेत्र हे शिफारस करण्यापुरतेच मर्यादित राहील.

इ) सदर "बाल विकास सल्लागार समिती" ची बैठक आवश्यकतेनुसार आयोजित करण्यात येईल.

ई) सदर समितीने राज्यातील बालकांवरील अत्याचार व फसवणुकीबाबत मागील १२ महिन्यात घडलेल्या, मिडीयामध्ये प्रसिद्ध झालेल्या प्रकरणांची सखोल चौकशी करून त्यामधील समस्या, त्यावरील उपाययोजना व इतर अनुषंगिक बाबींच्या संदर्भात सविस्तर अहवाल दोन महिन्यात शासनास सादर करेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०४१३१३२२३५५५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.04.20 18:12:16 +05'30'

**(सुनिल सरदार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.सभापती/उपसभापती/ सदस्य, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई,
६) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
९) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) अध्यक्ष व सदस्य, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई,
११) प्रधान सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१२) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१३) उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
१४) सह सचिव/उप सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१५) अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) सर्व समिती सदस्य (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत),
१७) निवडनस्ती, का.०३